**प्रशासकीय मान्यता**

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात राज्य योजनांतर्गत मंजूर अनुदानातून संस्थेकरिता यंत्र खरेदीस प्रशासकीय मान्यता.

---

कामा व आल्ब्लेस रुग्णालय, मुंबई

**महाराष्ट्र शासन**

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**

**शासन निर्णय, क्रमांक : सीएएच-२०१९/प्र.क्र.२७८/प्रशा-१**

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,

दिनांक : १८ जानेवारी, २०२०

**वाचा :**

1) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६.
2) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७.
3) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक ०७.०३.२०१८.
4) संचालक वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र : संवैशिवसं/कावऑरु.मुं/ रा.यो/ २०१९-२०/३-म/३०४०९/२०१९, दिनांक : १८.१०.२०१९.

**शासन निर्णय :-**

कामा व आल्ब्लेस रुग्णालय, मुंबई या संस्थेस सन २०१९-२० या आर्थिक वर्षात राज्य योजनांतर्गत यंत्रसामुग्री खरेदी करण्यासाठी रुपये १,२०,००,००० (एम कोटी वीस लक्ष  फक्त) इतके अनुदान मंजूर करण्यात आलेले आहे. सदर अनुदानातून एकूण रुपये १,२०,००,००० (अक्षरी एक कोटी वीस लक्ष  फक्त)  इतक्या रकमेची खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे यंत्रसामुग्री खरेदी करण्यास या शासन निर्णयान्वये पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

| अ. क्र. | यंत्राचे नांव | नग | प्रती नग किंमत | एकूण किंमत |
|---|---|---|---|---|
| १. | वेन्टीलेटर इन्फट/पॅडियाट्रिक | ०२ | ३१,३६,००० | ६२,७२,००० |
| २. | सोनोग्राफी मशीन | ०१ | १५,१०,००० | १५,१०,००० |

| अ. क्र. | यंत्राचे नांव | नग | प्रती नग किंमत | एकूण किंमत |
|---|---|---|---|---|
| ३. | एन.एस.टी. मशीन | ०३ | ३,००,००० | ९,००,००० |
| ४. | लॅबोरट्री व्हर्टिकल ॲटोक्लेव्ह | ०२ | ११,९८,००० | २३,३६,००० |
| ५. | आयएनआर मशीन फोर चानल | ०१ | ३,००,००० | ३,००,००० |
| ६ | लॅब रेफ्रिजरेटर | ०३ | १,७५,००० | ५,२५,००० |
| ७ | फुल्ली ॲटोमेटेड युरिन ॲनालायझर | ०१ | ८९,००० | ८९,००० |
| ८ | डिप फ्रिजर | ०१ | ६८,००० | ६८,००० |
| | | | एकूण | १,२०,००,००० |

**अटी :-**

१. सदर प्रशासकीय मान्यता राज्य योजनांतर्गत सदर संस्थेस मंजूर असलेल्या अनुदानातून प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर यंत्रसामुग्री हाताळणीसाठी नव्याने पदनिर्मितीची आवश्यकता नाही, याबाबत संचालनालयाने व संबंधित अधिष्ठाता यांनी खातरजमा करावी.

३. सदर विषयी "शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका" याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ मध्ये नमूद केलेल्या विहीत कार्यपध्दतीचे अनुपालन करण्यात यावे.

४. सदर यंत्रसामुग्री खरेदी विषयक प्रक्रिया "औषधे, तद्अनुषंगीक उपभोग्य वस्तू व वैद्यकीय उपकरणे या बाबींची खरेदी हाफकिन बायो-फामास्युटीकल्स कॉपोरेशन लि. मार्फत करण्याबाबत" निर्गमित शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७ नुसार करावी.

५. सदर यंत्रसामुग्रीची आवश्यकता असल्याचे व त्याची किंमत बाजारभावापेक्षा जास्त नसल्याची खात्री संचालक (वै.शि.) तसेच संबंधित अधिष्ठाता यांनी करावी.

६. सदर यंत्रसामुग्रीची विनिर्दिष्टे व्यापक, सर्वसमावेशक असून त्यानुसार यंत्रपुरवठा करु शकणारे किमान तीन उत्पादक/पुरवठादार यांचेकडून तीन निविदा प्राप्त होऊ शकतील अशा प्रकारची आहेत, असे संचालक (वै.शि.) यांनी प्रमाणित करावे.

७. प्रस्तावित यंत्रसामुग्रीचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भुत केलेला नसल्याबाबत व सदर यंत्रसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत संचालकांनी खात्री करावी.

८. मुख्य यंत्र व त्यांचे सुटे भाग (Accessories) यांच्या किंमती भिन्न दर्शविणे आवश्यक राहील.

९. सदर विषयी यंत्रसामुग्री खरेदीबाबत निर्णय घेताना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या लेखाशिर्षाखाली मंजुर अनुदानाच्या तरतूदीपेक्षा जास्त खर्च केला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

१०. उपरोक्त शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ मधील परिच्छेद क्रमांक ३.१.२ "किंमतीचा अंदाज व किंमतीचा वाजवीपणा" या शीर्षकाखालील परिच्छेद क्रमांक ३.१.२.१ मधील तरतूदीचे राज्यस्तरीय खरेदी समितीने अनुपालन करावे. सदर तरतूदीचे अनुपालन केलेल्या यंत्राच्या किंमतीस आवश्यकतेनुसार सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येईल.

**२.** या प्रयोजनासाठी उपरोक्त तक्यात नमूद केल्यानुसार येणारा यंत्रनिहाय खर्च सदर संस्थेस सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात राज्य योजनांतर्गत मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा व त्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

लेखा शिर्ष मागणी क्र. -एस-४
कामा व आल्ब्लेस रुग्णालय, मुंबई

| | | |
|---|---|---|
| ४२१० | - | वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यांवरील भांडवली खर्च |
| ०३ | - | वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन |
| १०५ | - | विषम चिकित्सा राज्य योजनांतर्गत योजना |
| (००) (३७) | - | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय यांचे बळकटीकरण श्रेणीवर्धन आणि यंत्रसामुग्री |
| ५२ | - | यंत्रसामुग्री व साधन सामुग्री (४२१० १६२९) |

**३.** शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग -२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००११८१०४७२९२११३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARUN
MURLIDHAR
RAO DAHALE

Digitally signed by ARUN MURLIDHARRAO DAHALE
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=b335b52903c5914ab29c9ba5a50897b7b2244d66593f50dd713da83860912503,
postalCode=400032,
street=MANTRALAYA ,MUMBAI,
serialNumber=30df743755280cf26ce97ec0978235f63f80f0bc4317129bf381eb48778f2e3d,
ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA,
cn=ARUN MURLIDHARRAO DAHALE
Date: 2020.01.18 12:30:29 +05'30'

( अ. मु. डहाळे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. महालेखाकार - १ ( लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई.
२. व्यवस्थापकीय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि., मुंबई.
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
४. अधिष्ठाता, सर ज.जी.समूह रुग्णालये, मुंबई
५. अधिक्षिका, कामा व आल्ब्लेस रुग्णालय, मुंबई.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. निवडनस्ती (प्रशा-१).